दिनांक ३ जानेवारी २०१८ रोजी माझी कन्या भाग्यश्री जाणीव जागृती अभियान-राज्यस्तरीय मेळावा-२०१८ कार्यक्रमाचे आयोजन /कार्यक्रम व्यवस्थानामार्फत (इव्हेंट मॅनेजमेंट) नेमुन त्यांच्या मार्फत करण्यासाठी झालेल्या पुर्वतयारीच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.३०४/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ सप्टेंबर, २०१८

वाचा :- महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.:- एबावि-२०१७/प्र.क्र.२८८/का.६, दिनांक २९ डिसेंबर २०१७

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागाच्या वतीने दिनांक १४ नोव्हेबर २०१७ रोजी राष्ट्रीय बाल दिनी, बालेवाडी पुणे येथे **बालिका सक्षमीकरण-राज्यस्तरीय मेळावा-२०१७** कार्यक्रमाचे आयोजन आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई व आयुक्त ,महिला व बाल विकास,पुणे यांच्याकडून संयुक्तपणे करण्यात येणार होता. तथापि कार्यक्रमाच्या आयोजनासाठी पुरेसा वेळ न मिळाल्यामुळे आता सदर कार्यक्रम दिनांक ३ जानेवारी २०१८ रोजी क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले जयंतीदिनी, बालेवाडी पुणे येथे **माझी कन्या भाग्यश्री जाणीव जागृती अभियान-राज्यस्तरीय मेळावा-२०१८** या नावाने साजरा करण्यात येणार होता. सदर कार्यक्रमावरील खर्च रुपये ३५२.५८ कोटीच्या मर्यादेत ठेवण्यास व निधी संक्षिप्त देयकावर काढण्यास वित्त विभागाने मंजूरी दिलेली आहे.

२. **माझी कन्या भाग्यश्री जाणीव जागृती अभियान-राज्यस्तरीय मेळावा-२०१८** कार्यक्रमाचे आयोजन बालेवाडी क्रीडा संकुलातील सुमारे २ लाख स्वे.मी.जागेत पेंडॉल टाकुन करण्याचे नियोजन करण्यात आले आहे. सदर कार्यक्रम इव्हेंट मॅनेजमेंट नेमून करण्याचे प्रस्तावित होते. त्याप्रमाणे ई निविदा प्रसिध्द करण्यास आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना दिनांक २९ नोव्हेंबर २०१७ च्या पत्रान्वये मंजूरी देण्यात आलेली होती. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी ई निविदा प्रसिध्द करुन L१ ठरलेले **अँगल ॲडव्हर्टायसिंग,मुंबई** यांना इव्हेंट मॅनेजमेंट म्हणून नेमण्याबाबतचा प्रस्ताव दिनांक २२/१२/२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला होता.

३. महिला व बाल विकास विभागाच्या वतीने दिनांक ३ जानेवारी २०१८ रोजी क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले जयंतीदिनी, बालेवाडी पुणे येथे **माझी कन्या भाग्यश्री जाणीव जागृती अभियान-राज्यस्तरीय मेळावा-२०१८** कार्यक्रमाचे आयोजनाचे काम **अँगल ॲडव्हर्टायसिंग,मुंबई** यांच्याकडून करुन घेण्यास तसेच त्यासाठी येणा-या रुपये १,२४,८८,६८०.०० ( रुपये एक कोटी चौवीस लाख अठयाऐंशी हजार सहाशे ऐंशी फक्त ) एवढया खर्चास शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर निधी कार्यक्रम पार पाडल्यानंतर मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांना कोषागारातून आहरीत करुन उपलब्ध करुन द्यावयाचा

होता. परंतु दिनांक ०३/०१/२०१८ रोजी महाराष्ट्र बंद असल्यामुळे कार्यक्रम रद्द करण्यात येत असल्याचे दिनांक ०२/०१/२०१८ रोजी सायंकाळी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांना कळविले होते. मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी कार्यक्रमाच्या आयोजनासाठी एकूण रुपये १,४६,९४,१६१/- इतका खर्च आलेला असल्याचे कळविले आहे. कार्यक्रम रद्द झाल्यामुळे रु.१,२९,४१,५५८/- इतक्या रक्कमेची मागणी त्यांनी केलेली आहे.

४. दिनांक ०३/०१/२०१८ रोजी प्रत्यक्षात कार्यक्रम झालेला नसला तरी कार्यक्रमाची पुर्वतयारी करण्यासाठी मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी काही रक्कम खर्च केलेली असल्यामुळे वित्त विभागाशी विचारविनिमय करुन मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी सादर केलेल्या देयकामधील काही बाबींमध्ये कपात करुन त्यांना रुपये ४८,५४,३१७/- (रुपये अठ्ठेचाळीस लाख चौपन्न हजार तीनशे सत्त**रा** फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागाच्या वतीने दिनांक ३ जानेवारी २०१८ रोजी क्रांतीज्योती सावित्रीबाई फुले जयंतीदिनी, बालेवाडी पुणे येथे **माझी कन्या भाग्यश्री जाणीव जागृती अभियान-राज्यस्तरीय मेळावा-२०१८** कार्यक्रमाचे आयोजनाचे काम **अँगल ॲडव्हर्टायसिंग,मुंबई** यांच्याकडून करुन घेण्यास तसेच त्यासाठी येणा-या रुपये १,२४,८८,६८०.०० ( रुपये एक कोटी चौवीस लाख अठयाऐंशी हजार सहाशे ऐंशी फक्त ) एवढया खर्चास शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर निधी कार्यक्रम पार पाडल्यानंतर मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांना कोषागारातून आहरीत करुन उपलब्ध करुन द्यावयाचा होता. परंतु दिनांक ०३/०१/२०१८ रोजी महाराष्ट्र बंद असल्यामुळे कार्यक्रम रद्द करण्यात येत असल्याचे दिनांक ०२/०१/२०१८ रोजी सायंकाळी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांना कळविले होते. मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी कार्यक्रमाच्या आयोजनासाठी एकूण रुपये १,४६,९४,१६१/- इतका खर्च आलेला असल्याचे कळविले आहे. कार्यक्रम रद्द झाल्यामुळे रु.१,२९,४१,५५८/- इतक्या रक्कमेची मागणी त्यांनी केलेली आहे.

२. दिनांक ०३/०१/२०१८ रोजी प्रत्यक्षात कार्यक्रम झालेला नसला तरी कार्यक्रमाची पुर्वतयारी करण्यासाठी मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी काही रक्कम खर्च केलेली असल्यामुळे वित्त विभागाशी विचारविनिमय करुन मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांनी सादर केलेल्या देयकामधील काही बाबींमध्ये कपात करुन त्यांना रुपये ४८,५४,३१७/- (रुपये अठ्ठेचाळीस लाख चौपन्न हजार तीनशे सत्तरा फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. सदर कार्यक्रमावरील खर्च २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०१) (०५) जनजागृती , प्रसिध्दी, प्रशिक्षण आणि मुल्यमापन (२२३५ A ९०१) ( २६-जाहिरात व प्रसिध्दी ) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ साठी मंजूर केलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

४. आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे यांनी मे. अँगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे यांना रुपये ४८,५४,३१७/- (रुपये अठ्ठेचाळीस लाख चौपन्न हजार तीनशे सत्त**रा** फक्त) इतकी रक्कम कोषागारातून अहारीत करुन अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

५. हा खर्च "मागणी क्र एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०१) (०५) जनजागृती, प्रसिध्दी, प्रशिक्षण आणि मुल्यमापन (२२३५ A ९०१) (२६-जाहिरात व प्रसिध्दी) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ साठी मंजूर केलेल्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

६. कोषागारातून निधी आहरित करण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांना " **नियंत्रक अधिकारी** " म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला,उप विभाग-एक मधील अ.क्र.६ नियम ४० नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००३१२१५०१४९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: CN = Lalsing Ramchandra Gujar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Development Department
Date: 2018.10.03 12:20:31 +05'30'

(ला.रा.गुजर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
४. उप आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
५. उप आयुक्त (सनियंत्रण) एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. आहरण व संवितरण अधिकारी,आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे
१०. आहरण व संवितरण अधिकारी, आयुक्त,ए.बा.वि.सेवायोजना,नवी मुंबई कार्यालय
११. मे. ॲंगल ॲडव्हर्टायझिंग, पुणे
१२. सह सचिव (श्री गुजर)/ उप सचिव (श्रीमती निवतकर) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग व्यय-६/विनियम,मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (कार्यासन ६)